चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम करण्यासाठी निधी वितरणास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः चंसैशा-२०१८/प्र.क्र.११४/एसएम-६**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय , मुंबई - ३२**
**तारीख : ६ ऑक्टोबर, २०१८**

वाचा - १) शासन निर्णय क्र. चंसैशा-२०१७/प्र.क्र.५५/एसएम-६, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक २२.८.२०१७
२) शासन निर्णय क्र. चंसैशा-२०१७/प्र.क्र.१९३/एसएम-६, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक २७.३.२०१८
३) शासन निर्णय क्र. चंसैशा-२०१७/प्र.क्र.१९३/एसएम-६, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक ३१.३.२०१८
४) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद,चंद्रपूर यांचे पत्र क्र.जिपचं/शि(मा)/सैशा/१३९४/२०१८, दिनांक २२.०६.२०१८
५) शासन निर्णय क्र. पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, वित्त विभाग, दिनांक २७.७.२०१८

**प्रस्तावना:-**

भिवकुंड,जि. चंद्रपूर येथील सैनिकी शाळेच्या प्रवेशद्वारासह संरक्षण भिंत, सिमेंट काँक्रीट नालीसह पोचमार्गाचे बांधकाम करण्याबाबतच्या रु. १२३६.७७ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग तसेच वित्त विभाग व सचिव समितीच्या मान्यतेने दिनांक १३.४.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. तसेच चंद्रपूर सैनिकी शाळेच्या इमारती व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी रु. २९६.८६ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास दिनांक २२.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर कामासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रु. ४०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. सदर बांधकम विहित मुदतीत पूर्ण करण्यासाठी उर्वरित रु. २५६.८६ कोटीं आवश्यक आहे.

२. भिवकुंड, जिल्हा चंद्रपूर येथील नवीन सैनिकी शाळेच्या इमारतीचे व पायाभूत सुविधांचे बांधकाम विहित कालावधीत पूर्ण करण्यासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२ चंद्रपूर यांनी मागणी केल्याप्रमाणे शिक्षणाधिकारी, जि. प. चंद्रपूर यांनी संदर्भाधीन क्र. (३) अन्वये रु. २५६.८६ कोटीची मागणी केलेली आहे. जुलै, २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात रु. १०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारा अर्थसंकल्पित केला असून नियोजन व वित्त विभागाने ७० टक्केच्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिली आहे. चंद्रपूर सैनिकी शाळेच्या इमारती व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

चंद्रपूर सैनिकी शाळेची इमारत व पायाभूत सुविधांचे बांधकामासाठी रु. २५६.८६ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकापैकी वित्त विभागाच्या आदेशानुसार रू.१००.०० कोटी (रुपये शंभर कोटी फक्त) इतक्या निधीपैकी ७०% निधी म्हणजेच रु. ७०.०० कोटी (रुपये सत्तर कोटी फक्त) सदर बांधकामासाठी

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास व खर्च करण्यास यापूर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक ई-४, ४२०२-शिक्षण,क्रीडा, कला संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२-माध्यमिक शिक्षण, (०१)- सैनिकी शाळेचे बांधकाम, (०१)(०५) चंद्रपूर येथे सैनिकी शाळेचे बांधकाम करणे (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३, मोठी बांधकामे या लेखाशीर्षातून खर्ची टाकण्यात येईल. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी कामाबाबतचा अहवाल वेळोवेळी शासन सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल सादर करावा.

३. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र. ९४/अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१७ च्या परिपत्रकातील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

४. सदर आदेश नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १२१/१४७१, दिनांक २५.०९.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७६१/१८/व्यय-५, दिनांक ०१.१०.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००६१७०३४१३०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2018.10.06 17:05:30 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:- माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित,**

१) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
४) जिल्हाधिकारी,चंद्रपूर
५) मुख्य कार्य अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर
६) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. २, चंद्रपूर
८) उप सचिव (अर्थसंकल्प),शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई यांना विनंती करण्यात येते की,
उक्त निधी BDS प्रणालीवर उपलब्ध करुन द्यावा.
९) शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, चंद्रपूर.

**प्रत माहितीसाठी:-**

१) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय,मुंबई-३२
२) मा. मंत्री (वित्त ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२

३) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई-३२
४) उप सचिव (शाळा व्यवस्थापन),शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
५) निवड नस्ती (एस एम-६)